# अॅमिस्टॅड

## गुलामांच्या जहाजाची गोष्ट

लेखिका: पेट्रिसिया मॅकिसॅक



चित्रे: सन्ना स्टॅनले

# ॲमिस्टॅड

## गुलामांच्या जहाजाची गोष्ट

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



ऑगस्ट 1839 मध्ये, अमेरिकी तटरक्षक दलाच्या जहाजावरील दोन अधिकाऱ्यांना *लाँग आयलंड* बेटाजवळ समुद्रात एक वेगळेच दृश्य दिसले. समुद्रात एक लांबलचक काळे जहाज होते. त्यावर एक स्पॅनिश झेंडा फडकत होता. जहाजाचे नाव होते *ॲमिस्टॅड*. स्पॅनिश भाषेत याचा अर्थ होतो, मैत्री.

काय वेगळे होते या जहाजात?

त्या जहाजाची शिडे फाटली होती. जहाजात कुणी कप्तान नव्हता. जहाज असेत वाहात चालले होते. ते निश्चित ठिकाणी जात नव्हते. काळ्या माणसांचा एक समूह जहाजाच्या डेकवर उभे राहून ओरडत होता.

काय करत होते ते लोक? ते जहाज न्यूयॉर्कला का आले होते? कोण लोक होते त्या जहाजावर?



अधिकारी या गोष्टीचा छडा लावण्याच्या कामाला लागले. ते त्या जहाजावर चढले. त्यांना माहीत नव्हते की ते आता अमेरिकी इतिहासातील एका रोमांचक आणि रोचक कहाणीचा भाग बनणार होते.

ही कहाणी काही महिन्यांआधी आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील *सिएरा लिओन* देशात सुरू झाली होती.




 Sierra Leone
सिएरा लिओन

 Mende tribal area
मेंडे आदिवासी क्षेत्र

*सेंगबे पीये* नावाचा एक माणूस एका छोट्याशा गावात राहात होता. तो *मेंडे* या आदिवासी जमातीचा होता. सेंगबेचे घर वर्तुळाकार होते. त्या घराला शंकुच्या आकाराचे गवताचे छत होते.

मोठे झाल्यावर त्याने आपल्या पत्नी आणि तीन मुलांसाठी असेच एक घर बनवले. तो तांदूळ पिकवणारा शेतकरी होता आणि आपल्या जमातीचा नेतासुद्धा होता.





एके दिवशी सेंगबे एकटाच भटकत होता. अचानक काही लोकांनी येऊन त्याला घेरले!

सेंगबेने स्वत:ची सुटका करून घेण्याचे आटोकाट प्रयत्न केले. पण त्या लोकांकडे बंदुका होत्या. ते गुलाम पकडणारे लोक होते. त्यांनी सेंगबेचे अपहरण केले.

त्या लोकांनी सेंगबेला फरफरटत एका गुलामांच्या जहाजात नेले. जहाजात शेकडो पुरुष, स्त्रिया आणि मुले भरली होती. ते जहाज *क्यूबा* देशात चालले होते.

गुलाम एका काळोख्या जागेत साखळ्यांनी जखडलेल्या अवस्थेत पडून होते. ते रडत होते, दयेची याचना करत होते. सेंगबेला वाटले की तो वेडा होईल. तिथे अंग सरळ करण्याएवढीही जागा नव्हती. तिथे फारच दुर्गंध येत होता.







गुलामांच्या जहाजाला अटलांटिक महासागर ओलांडून क्यूबाला पोहोचायला दोन महिने लागले. प्रवासादरम्यान दोन आफ्रिकी गुलामांचा मृत्यू झाला.

काही गुलामांना मारून टाकण्यात आले. काही गुलामांनी या भयानक प्रवासात स्वत:लाच संपवले. पण सेंगबेने आपल्या जीवाला जपले.

पुढे काय? सेंगबेला माहीत नव्हते. पण त्याने आशा सोडली नाही. त्याला आपल्या कुटुंबाला पुन्हा भेटायचे होते. “मी त्यांच्यासाठी जगेन,” तो मनाशी म्हणाला. घरी परतण्यासाठी काही ना काही मार्ग तो नक्कीच शोधणार होता.






क्यूबामध्ये या आफ्रिकी गुलामांना स्पॅनिश नावे देण्यात आली. मग सेंगबेचे नाव झाले, *जोसेफ सिंक*. काही दिवसांनी, त्याला ॲमिस्टॅड नावाच्या दुसऱ्या एका जहाजावर नेले.

ते जहाज दक्षिण अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील *ब्राझील* देशात जात होते. नव्या गुलामांना तिथे मोठ्या किंमतीत विकत असत.

सिंकने खलाशांना सांगायचा प्रयत्न केली की तो गुलाम नव्हता. तो आणि इतर आफ्रिकी लोक कुणी जनावरे नव्हती. पण कप्तानाने त्याचे ऐकले नाही. उलट त्याने सिंकला चाबकाचे फटके मारले.



सिंकने जहाजावरील गुलामांना शूर बनण्यास प्रोत्साहन दिले, “कणखर व्हा, आपला जीव वाचवा. मी गुलामांना मुक्त करण्यासाठी काहीतरी मार्ग नक्की शोधेन.” अशी ग्वाही त्याने दिली.

जहाजातील खोलीच्या कुजलेल्या लाकडात सिंकला एक सैलसर खिळा सापडला. त्याने मोठ्या कष्टाने साखळदंड अडकवलेला भिंतीतील तो खिळा उपटून काढला. त्याचे हात रक्ताने माखले. पण आता तो मुक्त होता. आता तो साखळदंड उघडण्यासाठी आणि आपला दुसरा हात मुक्त करण्यासाठी सक्षम होता. इतर आफ्रिकी लोकांनीही मग हळूहळू गुपचुपपणे स्वत:ला मुक्त केले.



रात्रीच्या आडोशात आफ्रिकी गुलामांनी वेगाने हालचाल करून घातकी हल्ला केला. त्यांना धारदार चाकू मिळाले आणि मग त्यांनी कप्तानाला ठार मारले. नंतर त्यांनी स्वयंपाकी लोकांनाही मारले. काही स्पॅनिश खलाशांनी पाण्यात उड्या मारल्या, तर काही जीवरक्षक बोटीतून पळून गेले.

आता जहाजावर केवळ दोन स्पॅनिश खलाशी उरले. सिंकने सांकेतिक भाषेचा उपयोग करत म्हटले, “आम्हाला पुन्हा आफ्रिकेला घेऊन चला, नाहीतर आम्ही तुम्हाला ठार मारू.”

खलाशांनी मान्य केले. पण त्यांची काही वेगळीच योजना होती. आफ्रिकेस परतण्यासाठी ॲमिस्टॅडने पूर्वेकडे प्रवास करायला हवा होता. दिवसा जहाज सूर्योदयाच्या दिशेने चालत असे. पण रात्रीच्या अंधारात जहाज कोणत्या दिशेने जात होते, ते आफ्रिकी गुलामांना कळत नसे. याचा गैरफायदा घेऊन स्पॅनिश खलाशी रात्री जहाज उत्तर दिशेने नेत असत. हळूहळू जहाज अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावर पोहोचले.



अमेरिका
United States
Cuba
क्यूबा

ऑगस्ट 1839 पर्यंत, ॲमिस्टॅड लाँग आयलंडच्या किनाऱ्यानजिक पोहोचले. त्याचवेळी दोन अमेरिकी अधिकाऱ्यांनी ते पाहिले.



ॲमिस्टॅडवर जाऊन अमेरिकी अधिकाऱ्यांनी स्पॅनिश खलाशांकडे संपूर्ण घटनेची चौकशी केली. ॲमिस्टॅड हे एक गुलामांचे जहाज असल्याची माहिती खलाशांनी दिली. जोसेफ सिंक आणि इतर 53 गुलामांनी कप्तानाला ठार करून जहाज ताब्यात घेतल्याचेही त्यांनी सांगितले. गुलामांनी खलाशांना ओलीस ठेवले होते. या सर्व घटना खऱ्या होत्या. पण खलाशांनी हा दावा केला की त्या आफ्रिकी गुलामांचा जन्म क्यूबामध्ये झाला होता. ही गोष्ट मात्र खोटी होती.

खूप लहानशी वाटू शकते, ही खोटी गोष्ट. पण ती अत्यंत महत्त्वाची होती.

1839 मध्ये, अमेरिकेतील अनेक राज्यांत गुलामगिरी प्रथा अस्तित्वात होती (1865 पर्यंत गुलामगिरी प्रथा संपली नव्हती). पण काही कायद्यान्वये, या प्रथेवर थोडीफार बंदी आणली होती. आफ्रिकी लोकांचे अपहरण करणे व त्यांना गुलाम बनवणे हा या कायद्याने गुन्हा ठरत होता. ॲमिस्टॅडवर हेच तर घडले होते.

सिंकला अमेरिकी कायद्यांची माहिती नव्हती. त्याला कशी माहिती असेल? त्याला तर हेसुद्धा माहीत नव्हते की ॲमिस्टॅड कोणत्या देशाच्या किनाऱ्याला पोहोचले होते. पण एक गोष्ट त्याच्या लक्षात आली की दोन्ही स्पॅनिश खलाशी अमेरिकी अधिकाऱ्यांशी खोटे बोलले.



गोरे लोक पैसे देऊन लांबचलांब रांगांमध्ये उभे राहून आफ्रिकी गुलामांकडे तुच्छतापूर्ण नजरेने पाहू लागले. गोऱ्या स्त्रिया त्यांच्यावर फिदीफिदी हसू लागल्या आणि पुरुष तोंडे वेडेवाकडी करून गुलामांना चिडवू लागले, जणू काही ते एखादी सर्कसच बघत होते.

ॲमिस्टॅडला नजिकच्या बंदरावर नेण्यात आले. हे बंदर *कनेक्टिकट* राज्यात होते. एक न्यायाधीश म्हणाले की आफ्रिकी गुलामांनी भयंकर गुन्हा केला होता. त्यांच्यावर हत्या आणि बंडाचे आरोप लावण्यात आले (कारण त्यांनी जहाज ताब्यात घेतले होते). सप्टेंबर 1839 मध्ये खटल्याची सुनावणी निश्चित झाली. कुणालाही जामीन मिळाला नाही. सर्व गुलामांना कनेक्टिकटच्या *न्यू हेवन* शहरातील तुरुंगात डांबण्यात आले. त्यांच्यात काही मुलेसुद्धा होती.





काही निर्मूलनवाद्यांनी ॲमिस्टॅडबद्दल ऐकले. त्यांनी स्पॅनिश खलाशांच्या कहाणीवर विश्वास ठेवला नाही. जर ॲमिस्टॅडवरील काळे लोक क्यूबामध्ये जन्मले होते तर त्यांच्यापैकी कुणालाच स्पॅनिश भाषा कशी बोलता येत नाही? नक्कीच त्यांना आफ्रिकेतून अपहरण करून आणले असणार, अनधिकृतपणे.

सिंकला गोरे लोक मोठे विचित्र वाटले. त्याने आणि इतर गुलामांनी तोंड फिरवून गोऱ्या लोकांकडे आपली पाठ केली. तुरुंगाच्या खोलीत सिंक मोठ्या काळजीत पडला होता. आता आपल्याला घर पाहायला मिळेल का कधी? त्याला खात्री वाटत नव्हती.

पण सिंकला हे माहीत नव्हते की या विचित्र देशात आफ्रिकी लोकांचे काही मित्रसुद्धा होते. उत्तरेकडील राज्यांमध्ये बहुसंख्य लोक गुलामगिरी प्रथेस पाप मानत असत. त्यांना *निर्मूलनवादी* म्हणत.

त्यांना गुलामगिरी प्रथा संपवायची होती.



निर्मूलनवाद्यांना आफ्रिकी गुलामांच्या मदतीकरिता एक प्रसिद्ध वकील मिळाला. त्याचे नाव होते, *रॉजर शेरमन बाल्डविन.* तोसुद्धा गुलामगिरी प्रथेच्या विरुद्ध होता. त्याच्या आजोबांनी स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यावर सही केली होती.

बाल्डविन जाणत होता की हे काम सहजसोपे नाही. तो आपल्या आफ्रिकी अशिलांशी बोलूही शकत नव्हता. खरंतर, त्याला हेसुद्धा माहीत नव्हते की ते कोणत्या आफ्रिकी भाषेत बोलत होते.





बाल्डविनने सांकेतिक भाषेत संवाद साधण्याचे प्रयत्न केले. पण त्याचा उपयोग झाला नाही. बाल्डविनने मातीत चित्रे रेखाटली. पण त्याचाही फायदा झाला नाही. सिंकला एवढे मात्र कळले की बाल्डविन त्यांना मदत करू पाहात होता. पण सिंकही हतबल होता.



तेव्हाच बाल्डविनला कळले की सिंकची भाषा मेंडे होती. ही एक चांगली सुरुवात झाली. बाल्डविनने मेंडे भाषा बोलणारा एक काळा माणूस शोधला. त्याचे नाव होते, *जेम्स कोवे*. त्यालाही पूर्वी आफ्रिकेतून अपहरण करून अमेरिकेत आणले होते.

पण कोवे नशीबवान ठरला होता. तो मुक्त झाला होता आणि खलाशी म्हणून काम करत होता.

कोवेच्या माध्यमातून बाल्डविन आणि सिंक एकमेकांचे बोलणे समजू शकले. “आम्हाला मुक्त व्हायचंय,” सिंकने बाल्डविनशी पहिला संवाद केला. मग सिंकने बाल्डविनला आपली कहाणी ऐकवली.

आता बाल्डविनला ठामपणे कळले की या आफ्रिकी लोकांना अपहरण करून आणले होते. हीच गोष्ट त्यांना न्यायालयापुढे ठेवायची होती.

8 जानेवारी 1840 रोजी खटला सुरू झाला. न्यू हेवनचे न्यायालय खचाखच भरले होते. बाल्डविन म्हणाला की हे आफ्रिकी गुलाम पूर्वी मुक्तपणे जगत होते. ते काही गुरेढोरे नव्हते, मालमत्ता नव्हते. त्यांचे अपहरण करून त्यांना इथे आणले होते. ॲमिस्टॅड जहाजावर ते स्वतःचा बचाव करत होते.

"इथे हजर असलेल्या कुणाही माणसाने हेच केलं असतं," बाल्डविनने न्यायालयाला ठणकावून सांगितले.



सहा दिवसांच्या खटल्यादरम्यान, सिंक आणि काही इतर आफ्रिकी लोकांनी साक्ष दिली. त्यांच्यात काही शेतकरी होते, शिल्पकार होते, वडील होते, मुलगे होते, मुली होत्या, बहीणी होत्या. ते एकाच समाजाचे सदस्य होते.



सिंकने सांगितले की मेंडे लोकांसाठी स्वातंत्र्य म्हणजे खूप काही असते. त्यांना कला, संगीत आणि नृत्य यांची आवड होती. अमेरिकी कायद्यांप्रमाणेच मेंडे समाजाचेही स्वतःचे कायदे, नियम होते. त्यांच्यातही न्यायाधीश, ज्यूरी वगैरे लोक होते.

“आम्हीसुद्धा माणूस आहोत,” सिंकने न्यायाधीशांना सांगितले.

न्यायाधीशांनी मान्य केले. त्यांनी निकाल ऐकवला. “ॲमिस्टॅडवरील आफ्रिकी गुलाम हे जन्माने मुक्त होते....आणि आताही मुक्तच आहेत, गुलाम नाहीत.”

अखेरीस त्यांचा विजय झाला!

“आपला खडतर काळ संपला एकदाचा,” सिंक आणि त्याच्या लोकांच्या मनात आले.



पण आत्ताच हा क्षण साजरा करणे घाईचे ठरणार होते. त्यांचे वकील रॉजर बाल्डविन यांना एक वाईट बातमी मिळाली.

स्पेनच्या सरकारने हटवादीपणे म्हटले की ते गुलाम त्यांची मालमत्ता होती. न्यू हेवन न्यायाधीशांनी काय निकाल दिला, याने त्यांना काही फरक पडत नव्हता. यापेक्षाही वाईट गोष्ट म्हणजे, अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष *मार्टीन वॅन ब्युरेन* हे स्पेनशी सहमत झाले.



आता काय होणार? आणखी एक खटला. आता सर्वोच्च न्यायालय निकाल देणार. पण नवा खटला सुरू होणार एक वर्षानंतर.

यादरम्यान, ॲमिस्टॅडवरील आफ्रिकींना पुन्हा तुरुंगात डांबण्यात आले.

सिंकचा राग अनावर झाला. तरीही त्याने आफ्रिकी गुलामांना, “धीर धरा,” असे सांगितले.

न्यू हेवनचे लोक आफ्रिकी लोकांच्या बाजुने होते. त्यांना आफ्रिकी लोक तुरुंगात नसायला हवेत, असे वाटत होते. तुरुंग ही चांगली जागा नव्हती. तेथील अन्न अगदीच मिळमिळीत होते. काही आफ्रिकी त्यामुळे आजारी पडले. त्यांच्यासाठी ताजे पाणी आणि स्वच्छ कपडे आणण्यात आले. पण सर्वांना तुरुंगातच राहावे लागले, अगदी मुलांनासुद्धा.





रॉजर बाल्डविनला नवीन खटला जिंकायला मदत हवी होती. राष्ट्राध्यक्ष त्यांना मदत करणार नाहीत हे स्पष्ट होते. पण एखादी महत्त्वाची व्यक्ति त्यांना मदत करू शकली असती. बाल्डविन माजी राष्ट्राध्यक्ष *जॉन क्विन्सी ॲडम्स* यांना भेटायला गेला.

जॉन क्विन्सी ॲडम्स 1825 ते 1829 पर्यंत राष्ट्राध्यक्ष होते. ते राष्ट्राध्यक्ष *जॉन ॲडम्स*चे पुत्र होते. आता ते प्रतिनिधी सभेचे सदस्य होते. ते 73 वर्षांचे होते. त्यांची बुद्धी तल्लख होती. त्यांचे बोलणे स्पष्ट आणि ठाम होते आणि त्यांना कायद्याचे सखोल ज्ञान होते.

जॉन क्विन्सी ॲडम्स तुरुंगातील आफ्रिकी गुलामांना भेटला. त्यांची लहान वये बघून त्यांना धक्काच बसला. “त्यांच्यापैकी अनेकजण 30 वर्षांपेक्षा कमी वयाचे होते,” त्यांनी आपल्या डायरीत लिहून ठेवले आहे.

तोवर मेंडे जमातीचे दोघे जण इंग्रजी लिहायला शिकले होते. त्यांनी ॲडम्सला एक पत्र पाठवून विनंती केली, “कृपा करून आमची याचना मोठ्या न्यायालयात पोहोचवा.”



मदतीसाठी त्यांनी केलेल्या याचिकेचा ॲडम्सवर प्रभाव पडला. तेदेखील चिंतेत पडले. “अरेरे! मी या खटल्याला आणि या माणसांना न्याय कसा देऊ?” पण त्यांनी आपल्याकडून कोणतीही कसर ठेवायची नाही, हे ठामपणे ठरवले.

काही महिने गेले. अनेक आजारी कैद्यांचा तुरुंगातच मृत्यू झाला. खटल्याच्या पुढल्या तारखेपर्यंत, 1 मार्च 1841 रोजी ॲमिस्टॅड जहाजावरील फक्त 37 आफ्रिकी जिवंत राहिले. सर्वोच्च न्यायालय *वॉशिंग्टन डी.सी.*मध्ये होते. खटला जिंकण्यासाठी वकिलांना किमान पाच न्यायाधीशांना हे पटवून द्यायचे होते की ते आफ्रिकी लोक मुळात गुलाम नव्हते. पण न्यायाधीशांपैकी पाच जण गुलामगिरी प्रथा प्रचलित असलेल्या राज्यांतील होते. त्यांच्यापैकी कोणी विश्वास ठेवेल का की ते आफ्रिकी निष्पाप होते?

सर्वात आधी, आफ्रिकी लोकांच्या विरुद्ध पक्षाने आपली बाजू मांडली. त्यांचे वकील म्हणाले की हे आफ्रिकी लोक एका स्पॅनिश जहाजावर होते, म्हणजे ते स्पेनची मालमत्ता होती. “त्यांचा खटला स्पेनमध्ये चालायला हवा.”




यानंतर रॉजर बाल्डविनची पाळी होती. तीन दिवसांत, त्याने 14 तासांपेक्षा जास्त वेळ वादविवाद केला. तो सर्वोच्च न्यायाधीशांना म्हणाला, “आपण इथे खुर्ची व टेबल यांच्याबद्दल नाही, तर हाडामांसाच्या माणसांबद्दल बोलत आहोत.”

मग शेवटी, जॉन क्विन्सी ॲडम्स बोलू लागले. ते एक मोठे वक्ते म्हणून प्रसिद्ध होते. “हे लोक गुन्हेगार नाहीत. त्यांनी फक्त आपले स्वातंत्र्य जपले, स्वत:चा बचाव केला.”

ॲडम्सने सिंकची तुलना अमेरिकी क्रांतीच्या नायकांशी केली. *पॅट्रीक हेन्री* स्वातंत्र्यासाठी लढला होता. तो म्हणाला होता, “मला स्वातंत्र्य द्या वा मृत्यू द्या.”

“पॅट्रीक हेन्री गुन्हेगार होता का?” ॲडम्सने न्यायाधीशांना विचारले.

कोर्टात शांतता पसरली. फक्त ॲडम्सचा आवाज तिथे घुमत होता.

“नाही,” ते म्हणाले. “तो एक हिरो होता.”

सर्वोच्च न्यायालयाच्या बहुतेक न्यायाधीशांनी ॲडम्सशी सहमती दर्शवली. ॲडम्स खटला जिंकला! ॲमिस्टॅडवरील आफ्रिकी लोक अखेरीस मुक्त झाले.

ही बातमी मिळताच आफ्रिकी लोक आनंदाने नाचू लागले. आता हा निकाल कुणीच, अगदी राष्ट्राध्यक्षसुद्धा बदलू शकत नव्हते.





तो दिवस होता, 9 मार्च 1841. आफ्रिकेतून अपहरण होऊन दोन वर्षे उलटली होती. आफ्रिकी लोक आपले आभार प्रगट करू इच्छित होते. त्यांनी जॉन क्विन्सी ॲडम्स यांना एक बायबल भेट दिले. त्यात लिहिले होते, “आम्ही आपले खूप खूप आभारी आहोत, कारण आपणच आम्हाला हे स्वातंत्र्य मिळवून दिले आहे.”



27 नोव्हेंबर या दिवशी सिंक आणि इतर आफ्रिकी लोक न्यूयॉर्कवरून निघाले. त्यांच्या जहाजाचे नाव होते *जंटलमन*. मेंडे खलाशी आणि अनुवादक जेम्स कोवे त्यांच्यासोबत आफ्रिकेला परतला. ते सगळे 11 जानेवारी 1842 रोजी सिएरा लिओनमधील *फ्रीटाऊन* शहरात पोहोचले.

शेवटी एकदाचे ते आपल्या घरी आले.



अमेरिकेत राहून सिंक इंग्रजी चांगल्या प्रकारे शिकला. तो सार्वजनिक स्तरावर क्वचितच बोलला असेल, पण निरोप घेण्याची वेळ आली तेव्हा तो इंग्रजीत बोलला. “दोस्तांनो, मी आपणा सर्वांचे आभार मानतो.”

नंतर सिंकचे काय झाले हे कुणालाच माहीत नाही. बातम्यांनुसार, तो आपली पत्नी आणि मुलांसमवेत आपल्या घरी आनंदाने राहिला. तो पुन्हा एकदा मुक्त आयुष्य जगू लागला. अमेरिकीतील यादवी संपल्यावर आणि राज्यघटनेत दुरुस्ती केल्यावर गुलामगिरी प्रथा पूर्णपणे संपुष्टात आली. ॲमिस्टॅड घटनेने गुलामगिरीविरुद्ध लढणाऱ्या सर्व लोकांमध्ये आशा जागवली.

“आम्हीसुद्धा माणूस आहोत!” सिंकने आपल्या खटल्यादरम्यान म्हटले होते. त्याच्या शब्दांनी गुलामगिरी प्रथेचे कंबरडेच मोडले गेले.





समाप्त